**<u>दर्जेदार मराठी चित्रपट निर्मितीस अर्थसहाय्य</u>**
**<u>मंजूर करणेबाबत - सुधारीत योजना.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन शुध्दीपत्रक क्र.मचिअ-२०१२ / प्र.क्र.१४१ / सां.का.१**
मंत्रालय (विस्तार), मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०८ ऑगस्ट, २०१८

<u>वाचा</u> : १. शासन निर्णय समक्रमांक, दि.३० ऑक्टोबर, २०१३.
२. शासन शुध्दीपत्रक, दि.२८ ऑगस्ट, २०१४.
३. महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्या., गोरेगांव, मुंबई यांचे पत्र क्र.प्रशासन/प्रशा-४/२०१७/३१४, दि.०२ फेब्रुवारी, २०१७.

**<u>प्रस्तावना</u> :**

संदर्भ क्र.१ येथील या विभागाच्या दि.३० ऑक्टोबर, २०१३ च्या शासन निर्णयान्वये दर्जेदार मराठी चित्रपट निर्मितीसाठी अर्थसहाय्य देण्याची योजना कार्यान्वित करण्यात आली आहे. सदर योजनेच्या प्रभावी व सुटसुटीत अंमलबजावणीसाठी संदर्भ क्र.२ येथील दि.२८ ऑगस्ट, २०१४ रोजीच्या शासन शुध्दीपत्रकान्वये काही सुधारणा करण्यात आल्या आहेत. आता संदर्भ क्र.३ येथील दि.०२ फेब्रुवारी, २०१७ च्या पत्रान्वये महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव यांनी व मराठी चित्रपट परिक्षण समिती सदस्यांनी अनुदान योजनेत काही सुधारणा सुचविल्या आहेत. त्या अनुषंगाने तसेच याबाबत शासनस्तरावर वेळोवेळी करण्यात आलेल्या विचारविनिमयानुसार, संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयात आवश्यक बदल करण्याची बाब विचाराधीन होती.

**<u>शासन शुध्दीपत्रक</u> :**

दर्जेदार मराठी चित्रपट निर्मितीस प्रोत्साहन देण्यासाठी अर्थसहाय्य मंजुर करण्याबाबतच्या प्रचलित योजनेत सुधारणा करण्यासंदर्भात प्राप्त झालेल्या सर्व सूचनांचा साकल्याने विचार केल्यानंतर शासनाने खालीलप्रमाणे दुरुस्त्या करण्याचा निर्णय घेतला आहे :-

| शासन निर्णय दि.३०.१०.२०१३ मधील पृष्ठ क्रमांक | शुध्दीपत्रकाचा तपशिल |
|---|---|
| २ | (१) अनुक्रमांक ३ खालीलप्रमाणे वाचावा.<br>‘चित्रपट निर्मात्यांस सदर योजनेचा लाभ त्यांनी निर्माण केलेल्या जास्तीत जास्त तीन चित्रपटांसाठी मिळू शकेल’<br>(२) अनुक्रमांक ४ मधील ‘या प्रत्येक निर्मात्याचे महाराष्ट्रात किमान १५ वर्षे वास्तव्य असल्याबाबत सक्षम प्राधिकाऱ्याचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील’ हे वाक्य वगळण्यात येत आहे. |
| ३ | (१) अनुक्रमांक १२ मधील ‘राष्ट्रीय पुरस्कार प्राप्त मराठी चित्रपट, मराठी लघुपट व चित्रकर्मी यांचा रोख पुरस्कार देऊन शासनातर्फे गौरव केला जाईल. मात्र इतर भाषेतील रिमेक, डब किंवा सबटायटल मराठी चित्रपट पुरस्काराकरीता पात्र ठरणार नाहीत. रोख पुरस्काराची रक्कम शासन वेळोवेळी निश्चित करील व |

| | |
|---|---|
| | यासाठी निधी महामंडळाला उपलब्ध करुन देईल. मात्र सत्कार सोहळयाचे आयोजन व आयोजनाचा खर्च महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ स्वनिधीतून करील.' ही बाब पूर्णत: वगळण्यात येत आहे.<br>(२) अनुक्रमांक १३ मधील 'परिशिष्ट-इ मध्ये नमूद आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवात उत्कृष्ट चित्रपटासाठी पुरस्कार प्राप्त न झालेल्या परंतु नामांकन प्राप्त करणाऱ्या तसेच पॅनोरामा सेक्शन मध्ये निवड झालेल्या मराठी चित्रपटांना शासनातर्फे प्रत्येकी रुपये १.०० लाखाचा पुरस्कार निर्माता व दिग्दर्शक यांना विभागून देण्यात येईल. अशा चित्रपटाच्या निर्मात्याने योग्य त्या प्रमाणपत्रांसह व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव (पूर्व), मुंबई - ४०० ०६५ यांचेकडे अर्ज सादर करावा.' ही बाब पूर्णत: वगळण्यात येत आहे. |
| ४ | अनुक्रमांक १७ नंतर अनुक्रमांक १८ पुढीलप्रमाणे अंतर्भुत करण्यात येत आहे 'किमान रु.१ कोटी इतका निव्वळ नफा (Net Profit) ज्या चित्रपटाच्या ताळेबंदात दर्शविला असेल असा चित्रपट अनुदानासाठी पात्र नसेल.' |
| ५ | परिशिष्ट 'अ' मधील अनुक्रमांक ७ खालील प्रमाणे वाचावा.<br>'सदर योजना किमान ९० मिनिटे लांबीच्या मराठी चित्रपटांना (फिचर फिल्म) लागू राहील.' |
| ६ | (१) परिशिष्ट 'अ' मधील अनुक्रमांक ८ मधील 'चित्रपट निर्मात्याने राज्याच्या प्रत्येक (सहा) महसूली विभागात एक आठवडयाकरीता व राज्यात एकूण दहा आठवडे चित्रपट प्रदर्शित करणे बंधनकारक आहे'<br>**याऐवजी**<br>'चित्रपट निर्मात्याने राज्याच्या किमान ४ महसूली विभागात एक आठवडयाकरीता व राज्यात एकूण दहा आठवडे चित्रपट प्रदर्शित करणे बंधनकारक आहे' असे वाचावे.<br>(२) अ.क्र.८ मधील 'व संबंधित जिल्हयाच्या शासकीय करमणूक कर अधिकारी यांचे प्रमाणपत्र' हे शब्द वगळण्यात येत आहे. |
| ७ | (१) परिशिष्ट'ब' मधील अनुक्रमांक vii) येथील कला दिग्दर्शनाचे १० गुण याऐवजी ५ गुण असे वाचावे.<br>(२) परिशिष्ट 'ब' मधील अनुक्रमांक viii) येथील ध्वनी तसेच इतर तांत्रिक कामगिरी ५ गुण ऐवजी<br>ध्वनी तसेच इतर तांत्रिक कामगिरी / पार्श्वसंगीत १० गुण असे वाचावे.<br>(३) परिशिष्ट 'ब' मधील ज्या चित्रपटांना ५१ ते ७० गुण मिळतील त्यास 'ब' आणि ७१ च्या पुढे गुण मिळतील त्यास 'अ' दर्जा दिला जाईल. |
| ८ | परिशिष्ट 'क' मधील अनुक्रमांक ४,५,६ व ७ पूर्णत: वगळण्यात येत आहे. |
| ९ | (१) परिशिष्ट 'क' मधील अनुक्रमांक ८ नंतर ८ (अ) खालीप्रमाणे वाचावा.<br>८ (अ) 'चित्रपटांची लांबी मिनिटांमध्ये द्यावी' ........ मिनिटे<br>(२) परिशिष्ट 'क' मधील अनुक्रमांक १० मधील 'ब' वगळावे. |

| | |
|---|---|
| ११ | (१) परिशिष्ट ‘क’ च्या प्रपत्रातील अनुक्रमांक ४,५ व ६ वगळण्यात येत आहे.<br>(२) परिशिष्ट ‘क’ च्या प्रपत्रातील अनुक्रमांक ७ मधील ‘राज्याच्या सहा महसूली विभागातील प्रत्येकी एक आठवडा’<br>**याऐवजी**<br>‘राज्याच्या चार महसूली विभागातील प्रत्येकी एक आठवडा’ असे वाचावे. |

२. सदर शासन निर्णयान्वये करण्यात आलेल्या सुधारणा या शासन निर्णयाच्या दिनांकापासून लागू होतील.

३. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८०८०८११३८३६०९२३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shailesh Tukaram Jadhav

Digitally signed by Shailesh Tukaram Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f28af075ed91b64d12528e9ab00bb144f43fcf33c23ccf14c820b969f8ca273, serialNumber=a90555ec4a073187eb44ee0b1aa93e5c855afff34eedb4b03bb3e0a6cfd6271c, cn=Shailesh Tukaram Jadhav
Date: 2018.08.08 16:13:28 +05'30'

**( शैलेश तु. जाधव )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे विशेष कार्य अधिकारी,मंत्रालय,मुंबई.
४. मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई.
५. सर्व सन्माननीय विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
६. महालेखापाल (लेखा व परीक्षा ) एक, महाराष्ट्र, मुंबई.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) एक, महाराष्ट्र, मुंबई.
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. सर्व विभागीय आयुक्त.
११. सर्व जिल्हाधिकारी.
१२. महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१५. संचालक, सांस्कृतिक कार्य, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव (पू), मुंबई.
१७. व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ, कोल्हापूर.
१८. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागातील सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई.
१९. अध्यक्ष, अखिल भारतीय मराठी चित्रपट महामंडळ, रविंद्र नाटयमंदिर, प्रभादेवी, मुंबई.
२०. निवड नस्ती - सां.का.१